GR - 20040408121754001-0100

**भूतपूर्व निवड मंडळाकडून शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांना विहित कालमर्यादेत नियुक्ती देण्याबाबत ..........**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्र. प्रानिमं ३०००/प्र.क्र.३८/२०००/१३-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३० ऑगस्ट, २०००.

पहा :- १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं ३०८९/प्र.क्र.६९/८९ १३-अ, दि. ५/५/१९८९.

२) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.प्रानिमं २७९२/५७४/(मुमं)/ प्र.क्र.१७/९२/१३-अ, दि.१७/२/१९९३.

३) शासन परिपत्रक,सामान्य प्रशासन विभाग,क्र.प्रानिमं २६९३/प्र.क्र.११७/ ९३/१३-अ, दि. १८/३/१९९४.

४) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.प्रानिमं ३०००/प्र.क्र.१०/२०००/ १३-अ, दि.२१/६/२०००.

५) शासन निर्णय,वित्त विभाग क्र.बी.जी.टी.१०००/प्र.क्र.१३/२०००/ अर्थसंकल्प-१९, दि.२१/६/२०००.

## प रि प त्र क

राज्यातील निवड मंडळाची कार्यालये, दि.२१/६/२००० पासून बंद करण्यात आली असून त्यांच्याकडील निवड प्रकियेतील प्रलंबित कामकाज प्रकरणपरत्वे, जिल्हा निवड समित्या/विविध प्रशासकीय विभागांनी विभाग प्रमुखांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या निवड समित्या/विभागीय आयुक्तांकडील समित्यांकडे हस्तांतरित करण्यात आले आहे. त्यानुसार संबंधित समित्यांकडून निवड प्रक्रियेचे कामकाज पूर्ण करुन नियुक्ती प्राधिका-यांकडील मागणीप्रमाणे उमेदवारांची नियुक्तीसाठी शिफारस करण्यात येत आहे. अ.क्र. १ व २ येथील शासन निर्णयाद्वारे निवड मंडळ पुरस्कृत उमेदवारांना विहीत कालमर्यादेत नेमणूक देणे ही नियुक्ती प्राधिका-यांची व्यक्तिशः जबाबदारी समजण्यात आली आहे. जे अधिकारी याचे उल्लंघन करतील ते महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियमानुसार शिस्तभंगाच्या कार्यवाहीस पात्र ठरतील असेही नमूद करण्यात आले आहे. निवड मंडळ कक्षेतील पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात नियुक्त करण्यात आलेल्या उमेदवारांना कायम नियुक्तीचे कोणतेही हक्क प्राप्त होत नसल्याने अशा उमेदवारांच्या सेवा तात्काळ समाप्त करुन निवड मंडळ पुरस्कृत उमेदवारांना नियुक्ती देण्याची, दि. १८/३/९४ च्या आदेशान्वये (सर्वोच्च न्यायालय व उच्च न्यायालयाच्या न्याय निर्णयावर आधारित)तरतूद करण्यात आली आहे. तरी देखिल निवड समित्या व भूतपूर्व निवड मंडळाकडून शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांना नियुक्ती प्राधिका-यांकडून नेमणूक देण्यात येत नसल्याचे , शासनाच्या निदर्शनास आले आहे.

~~GR - 200404081637170001~~-

(कृ.मा.प.

२. उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता सर्व नियुक्ती प्राधिका-यांना अशा सूचना देण्यात येत आहेत की, दि. २९/२/२००० पूर्वी रिक्त झालेल्या पदांवर निवड समिती वा भूतपूर्व निवड मंडळाकडून शिफारस करण्यात आलेल्या उमेदवारांना नेमणूक देण्यासंदर्भात वित्त विभागाचे बंधन नाही. तथापि, दि.२९/२/२००० पूर्वी रिक्त झालेली पदे व्यपगत झाली असल्यास, वित्त विभागाच्या सल्ल्यानुसार सदर पदे पुनर्जिवीत करुन घेणे आवश्यक राहील. तथापि, अन्य काही प्रशासकीय अडचणीस्तव निवड मंडळ पुरस्कृत उमेदवारांना नेमणूक देणे शक्य नसल्यास, नियुक्ती अधिका-यांनी प्रशासकीय विभागाच्या सल्ल्यानुसार विनाविलंब उचित कार्यवाही करावी.

३. मंत्रालयीन विभागांना अशी विनंती करण्यात येते की, या परिपत्रकातील सूचना आपल्या नियंत्रणाखालील कार्यरत असलेल्या सर्व नियुक्ती प्राधिका-यांच्या निदर्शनास आणण्यात येऊन निवड मंडळ पुरस्कृत उमेदवार नियुक्तीपासून वंचित राहणार नाही, या बाबतची खातरजमा करुन घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(भि.रा.वाळवे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
४. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा परीक्षा ), मुंबई/नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
* ८. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा,मुंबई,
* ९. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा,मुंबई,
* १०. प्रबंधक,लोक आयुक्त/उप लोक आयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
* ११. सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,मुंबई,
* १२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
* १३. सचिव,राज्य निवडणूक आयोग,मुंबई,
१४. सर्व विभागीय आयुक्त,
१५. सर्व जिल्हाधिकारी,
१६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१७. सर्व मंत्रालयीन विभाग
१८. सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख.
१९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२०. विशेष अधिकारी, सेवा भरती मुंबई यांचे कार्यालय,मुंबई,
२१. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने
२२. निवड नस्ती.

* पत्राने

---

एच-866(4000-9-2000)अ.